**गराडे ल.पा. प्रकल्प ता.पुरंदर जि.पुणे या प्रकल्पाच्या कालव्याचे बंदिस्त पाईपलाईन मध्ये रुपांतरीत करण्याच्या कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१८/ (प्र.क्र.३७२/२०१८)/ सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १५/१०/२०१८

**वाचा -**

१. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.म.कृ.खो.वि.म./(सिंव्य.१)/१६/(५४०/१८)/११६२/DA, दि.२६/०९/२०१८.
२. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांचे जा.क्र. मु.अ.(जसं)/काअ-२/ प्रशा-६/विसु/गराडे/०३१६४/२०१८, दि.११/०७/२०१८.
३. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
४. शासन निर्णय - संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६/०५/२०१७.

**प्रस्तावना :-**

गराडे ल.पा.प्रकल्प ता.पुरंदर जि.पुणे हा प्रकल्प गराडे गावानजीक असलेल्या क-हा नदीवर असून या प्रकल्पाचे बांधकाम सन १९७२ साली पूर्ण झाले आहे. क-हा नदीवर असलेला हा लघु प्रकल्प नाझरे धरणाच्या पाणलोट क्षेत्राखाली येतो. क-हा नदी ही नीरा नदीची प्रमुख उपनदी आहे. या प्रकल्पाकडे गराडे गावाजवळून जाणा-या खेड-शिवापूर - सासवड या रस्त्यावरून जाता येते. गराडे ल.पा.प्रकल्प हे ३७३ मी. लांबीचे मातीचे धरण असून धरण माथ्याची रुंदी ३ मी. इतकी आहे. या प्रकल्पाची धरण माथा पातळी १५१.८३ मी., महत्तम पूर पातळी १५०.०० मी., पूर्ण संचय पातळी १४७.८७ मी. तसेच धरणाची उंची ही १८.८२ मी. इतकी आहे.या प्रकल्पाचा एकूण पाणी साठा १.८५ द.ल.घ.मी. व उपयुक्त पाणी साठा १.५६ द.ल.घ.मी. तसेच १४०.८५ मी. या तलांक पातळीला मृत पाणी साठा ०.२९ द.ल.घ.मी. इतका आहे. या प्रकल्पाचा सांडवा हा धरणाच्या उजव्या बाजूस असून त्याची लांबी १२९.५० मी. आहे. गराडे ल.पा.प्रकल्पावर आस्तित्वातील मुख्य कालवा हा ५६०० मी. लांबीचा असून सुरुवातीच्या मुख्य कालव्याची लांबी २३१० मी. आहे. साखळी क्र.२३१० येथून उजवा व डावा मुख्य कालव्याची सुरुवात होते. उजव्या मुख्य कालव्याची लांबी १२४० मी. असून डावा मुख्य कालव्याची लांबी २०५० मी. आहे. मूळ प्रकल्प अहवालाप्रमाणे या प्रकल्पाचे एकूण लाभक्षेत्र ५०२ हेक्टर असून लागवडीलायक क्षेत्र ३७३.५० हेक्टर आहे त्या पैकी ३७२.०० हेक्टर क्षेत्र सिंचनाखाली येते (१२९ हे. २४३ हे.). गराडे, कोडीत, हिवरे आणि चांबळी ही सर्व गावे ता.पुरंदर, जि.पुणे ही या प्रकल्पांतर्गत लाभार्थी गावे आहेत. धरणाच्या डाव्या बाजूस साखळी क्र.१८० मी. वर विहिर प्रकारातील मुख्य शीर्ष विमोचक बांधण्यात आले आहे. या मुख्य शीर्ष विमोचकामधून निघणा-या कालव्याचा तळ उतार १:१५०० असून कालव्याच्या मुखाशी विसर्ग ७.०० क्युसेक्स इतका आहे. सदर गळती बंद होण्यासाठी आवश्यक ती गळती प्रतिबंध म्हणून बंदिस्त आर.सी.सी पाईपलाईन करण्याचे प्रस्तावित आहे. सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापर संस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. या अनुषंगाने संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या

अधिकाराचा वापर करुन सदर कामाकरीता विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

**गराडे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता. पुरंदर, जि. पुणे** विशेष दुरूस्ती कामास विस्तार व सुधारणा अंतर्गत बंदिस्त पाईपलाईन व्दारे कालवा नव्याने करण्याच्या कामास रु.**४,३६,९५,०६१/-**, ETP रु.१२,९७,८७३ /-, अशा **एकूण रु.४,४९,९२,९३४/- ( रू.चारशे एकोणपन्नास लक्ष ब्यानव्व हजार नऊशे चौतीस फक्त)** एवढया खर्चाच्या प्रस्तावास आं.वि.स.व उ.स. यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि.०१.०१.२०१५ मधील मागदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन परिपत्रक क्र. सिंचन -२०१५/प्र.क्र.२४/(भाग-२)/२०१५/जसं(धोरण), दि.०२/०२/२०१७ मधील मागदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी.

३. शासन पत्र दि.०४/०६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार २ % मर्यादेत निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. सदर कामास प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर सविस्तर संकल्पन करुनच तांत्रिक मान्यता देण्यात यावेत, तसेच प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच्या आत अंदाजपत्रकाची किंमत राहावी व याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

५. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

६. प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे, कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे याची जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

७. माती कामे व गवत झाडे / झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

८. प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम/ तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

९. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

१०. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करुन द्यावे.

११. विषयांकित अंदाजपत्रकातील तरतूदी, दर, वहनअंतर व तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

१२. बंद नलिका संकल्पन करतांना वितरण व्यवस्था निर्वेधपणे कार्यरत राहील यासाठी शासनाने निर्गमित केलेली मार्गदर्शक तत्त्वे न चुकता अंमलात आणावीत.

प्रस्तावित कामावर होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, १९०, सार्वजनिक व इतर उपक्रमातील गुंतवणूक (१०) उर्वरीत महाराष्ट्र (१०) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान (विस्तार व सुधारणा) (उर्वरित महाराष्ट्र) (४७०२ ७४५२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या खाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७ मध्ये विहित केल्यानुसार कामांच्या खर्चाबाबतीत रू. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार आं.वि.स व उ.स. यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवही क्र.७ सन २०१८-१९ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०१८१०१५१७१२३५२४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.10.15 17:19:15 +05'30'

**( अ.अ. कपोले )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
८) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव( वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
१२) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
१५) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१६) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
१७) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
१८) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ,पुणे.
१९) कार्यकारी अभियंता,उपसा सिंचन व्यवस्थापन विभाग,पुणे.
२०) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१८/ (प्र.क्र.३७२/२०१८)/ सिं.व्य.(कामे), दि.१५ / १० /२०१८ चे सहपत्र

## Recapitulation Sheet

| Sr.No. | Sub Head | Amount in (Rs) |
|---|---|---|
| 1 | 2 | 3 |
| 1 | C-Works | 4,41,00,465 |
| | Deduct item no 30 from abstract | (-)8,38,028 |
| | Net amount of C-Works | 4,32,62,437 |
| 2 | O-Misc 1% on C-Works | 4,32,624 |
| | **Total Work Portion** | **4,36,95,061** |
| | Contingencies ( 3 % on C-Works ) | 12,97,873 |
| | **Grand Total** | **4,49,92,934** |

टिप- शासन निर्णय क्र. सिंचन -२०१५/प्र.क्र.२४/२०१५/जसं(धोरण) , दि.१३/०१/२०१७ मधील अ.क्र ९ नुसार अंदाजपत्रकात देखभाल व दुरुस्ती कालावधी करीता कोणतीही रक्कम रोखून ठेवण्याची तरतूद नसल्यामुळे अंदाजपत्रकातील गोषवाऱ्यामधील बाब क्र.३० वगळण्यात आली आहे.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.10.15 17:20:22 +05'30'

( अ.अ.कपोले )
शासनाचे उप सचिव